# WE ARE PROFESSIONALS



Professionalism is knowing HOW to do it,WHEN to do it and DOING IT..

www.esahity.com

ई - साहित्य प्रतिष्ठान

वर्ष : तिसरे , अंक : १४

दिनांक : ४ एप्रिल २०११

# नेटाक्षरी

- संपादक -

स्वप्ना कोल्हे

( नाशिक )

- अतिथी संपादक -

डॉ.अशोक कुलकर्णी

( औरंगाबाद )



- सहसंपादक -

सोनाली घाटपांडे ( पुणे )

भारती सरमळकर ( मुंबई )

सचिन काकडे ( मुंबई )

शशिकांत रणवरे ( मुंबई)

सारंग भणगे ( पुणे )

**हे कवी Professionals असलेले कवी आहेत की कवी असलेले Professionals आहेत ?**

नेटाक्षरीचा हा अंक तुम्हाला अशा संभ्रमात जरुर टाकेल कारण ह्या अंकात आम्ही तुमच्यापुढे सादर करतोय विविध व्यवसायातल्या कवींच्या त्या त्या व्यवसायिक भाषेतल्या कविता.कविता म्हटलं म्हणजे त्यात फक्त चंद्र,सूर्य,तारे ह्यांच्याविषयीच लिहता येतं असं नाही तर प्रेमात घायाळ झालेल्या प्रियकरासाठी डिसेक्शन बॉक्स घेऊन येणाऱ्या प्रेयसीवरचं प्रेम व्यक्त करता येतं आणि प्रेमभंगातलं शेवटचं balanceshit देखील tally करता येतं.आणि अशा सुंदर कविता लिहणं हे फक्त कवींनाच जमतं असं नाही तर डॉक्टर,इंजिनिअर,वकील देखील संवेदनशीलतेने आपली व्यथा आपल्या व्यवसायाच्या भाषेत चक्क कवितेत व्यक्त करु शकतात.कसं ? चला वाचा तर ह्या Professionals च्या कविता..

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी* netaksharee@gmail.com

## अतिथी संपादकाच्या लेखणीतून..

अरे व्वा ! तुम्ही डॉक्टर असून सुद्धा कविता लिहता ? हा मला विचारला जाणारा नेहमीचा प्रश्न.आधी वाटायचं की यात आश्चर्य वाटण्यासारखं काय आहे ? अरेच्चा ! तुम्ही डॉक्टर असून सुद्धा दरोडे घालता ? हा प्रश्न असता तर गोष्ट वेगळी.या प्रश्नात तुम्हाला एवढा वेळ कसा मिळतो,तुम्ही या धबडग्यात रसिकता कशी काय टिकवून ठेवली हे उपप्रश्न अंतर्भूत असतात.वेळेच्या बाबतीत सांगायचं तर बिझी माणूस वेळ काढू शकतो कारण त्याच्या वेळेचं नियोजन पक्कं असतं असं मला वाटतं.राहता राहिला प्रश्न रसिकता टिकवण्याचा.माझ्या एका कवितेत डॉक्टरांची ही व्यथा मी मांडलीय.

फिनेल स्पिरीटच्या वासांनी नाकाला घेराव केले , वेदनेच्या आकांतांनी कानसुध्दा बधिर झाले
रोज रोज मरण बघून डोळेसुद्धा कोरडे झाले , मित्रांचं तर जाऊ द्या अश्रू सुध्दा गद्दार झाले

रोज रोज मरण बघून असं होतं हे खरं असलं तरी दुःख,वेदना आणि मरण बघून डॉक्टर एकूणच जीवनाकडे इतर सामान्य लोकांपेक्षा वेगळ्या दृष्टिकोनातून पाहू शकतात.म्हणूनच ज्या ऑपरेशन थिटरमध्ये जायला पेशंट घाबरतात तिथं सर्जन गुणगुणत काम करु शकतो,मरणासन्न रुग्णाला धीर देऊ शकतो आणि एक्सिडेंटच्या १० केसेस आल्या तरी शांतपण,खंबीरपणे त्यांना सामोरे जाऊ शकतो.मात्र कधीकधी गंमत होते.रिटायरमेंटच्या दिवशी पॅथोलॉजिस्ट सासरा झाला , मुलगा सून दोघं आले,पाय त्याचे धरु लागले.मुलगा म्हणाला,बाबा,सून तुमची कशी आहे , निवड माझी कशी आहे ?पॅथोलॉजिस्ट म्हणाला , काहीच सांगणं जमत नाही ,मायक्रोपशिवाय काहीच दिसत नाही.

डॉक्टर कलावंत अनुभवांची अभिव्यक्ती इतरांपेक्षा वेगळ्या पध्दतीने करतात असं दिसतं.त्यात रोगनिदानात डिफरन्शीअल डायग्नोसिस करण्यासाठी आवश्यक असलेला ऍनालिटीक माईंडसेट त्याचा तयार असतो.तो भावना आणि विचार यांची गल्लत करत नाही.त्यामुळेच डॉक्टर कलावंत वेगळे आणि उठून दिसतात,हे डॉक्टर काशिनाथ घाणेकर, डॉक्टर श्रीराम लागू, डॉक्टर मोहन आगाशे, डॉक्टर जब्बार पटेल, डॉक्टर गिरीश ओक इ.उदाहरणांवरुन लक्षात येईल.

माझी पहिली आवड नाटक आणि दूसरी कविता.माझ्या व्यवसायाचा आवडीवर आणि आवडीचा व्यवसायावर अपरिहार्य असा परिणाम झालेला आहे.माझे कलावंत मित्र मला चांगला डॉक्टर समजतात आणि माझ्या डॉक्टर मित्रांचा मी चांगला अभिनेता,कवी असल्याचा गैरसमज आहे.काही तोटेही झालेत.कधी कधी मी कितीही कळवळून सांगितलं की माझं डोकं दुखतंय तर डॉक्टर मित्र म्हणतात,ए नाटक करु नकोस आणि एकदा नाटकाची तालीम चालू असतांना एका सहकारी कलावतांला चक्कर आली तेव्हा माझ्यासमोर मी तिथे असतांना आरडाओरडा झाला,अरे जा लवकर, डॉक्टरला बोलाव पळ.

तसंच डॉक्टर झाली तरी कुटूंबवत्सल स्त्री आधी आई आणि मग मग डॉक्टर असते.माझा एक डॉक्टर वर्गमित्र औरगांबादला प्रसिद्ध सर्जन आहे.तिथल्या नामवंत रुग्णालयात गुंतागुंतीच्या अनेक शस्त्रक्रिया त्यानं केल्या.त्याच्या मुलाला खेळतांना जखम झाली.टाके द्यायची वेळ आली.त्याची बायको प्रसिध्द बालरोगतज्ञ.मुलाची जखम बघून काळजीनं नवऱ्याला म्हणाली,अहो चला याला एखाद्या चांगल्या सर्जनकडे घेऊन जा आणि टाके घालून आणा.माझा मित्र प्रा.अजित दळवी यानं 'डॉक्टर तुम्ही सुध्दा' हे नाटक लिहून आणखी एक प्रश्न समस्त डॉक्टर मंडळींना विचारलाय.डॉक्टर,शिक्षक यांच्याकडून काही अपेक्षांच्या चौकटीत वर्तन अपेक्षित असतं, डॉक्टर,वकील,सी.ए.या व्यावसायिकांना त्यांच्या व्यावसायिक वर्तनाबद्दल मार्गदर्शन करणारी आचारसंहिता असते. डॉक्टरांच्या व्यावसायिक वर्तनासाठी हिपोक्रेटिस ओथ प्रमाण मानली जाते.बदलत्या काळास अनुसरुन त्यात बदल झाले आहेत आणि ही शपथ सुधारित स्वरुपात घेतली जाते. भारतातल्या काही डॉक्टरांनी मात्र ही आचारसंहिता गुंडाळून ठेवली आणि मग कोर्टाला आणि कायदेमंडळाला डॉक्टरांच्या सेवा ग्राहक संरक्षण कायद्याच्या कक्षेत आणाव्या लागल्या.

याला ही मुठभर मंडळीच कारणीभूत आहेत.व्यावसायिकता म्हणजे काय हा या निमित्तानं उपस्थित झालेला प्रश्न.डॉक्टरच्या बाबतीत स्वतःच्या हितापेक्षा रुग्णाच्या हिताला प्राधान्य देणं ही व्यवसायाच्या बाबतीत माझी सुटसुटीत अशी व्याख्या आहे.रुग्णाच्या हितातचं आपलं हित आहे हे जो डॉक्टर जाणेल त्याप्रमाणे आचरण ठेवेल तो व्यावसायिक नीतिप्रमाणे वागतो असं म्हणता येईल.अभिनेत्याच्या बाबतीत प्रेक्षागृहात १० प्रेक्षक आहेत की ५००,प्रयोग धर्मार्थ आहे की तिकीट लावून ? याचा विचार न करता दोन्ही ठिकाणी त्याच तन्मयतेने अभिनय करणारा अभिनेता त्याच्या व्यवसायाशी प्रामाणिक आहे असं म्हणता येईल.

मात्र व्यावसायिकता ही तारेवरची कसरत आहे.व्यावसायिकता आणि कौटुंबिक आयुष्य यात समतोल आवश्यक आहे.नोकरीच्या ठिकाणी सहकाऱ्याशी फोनवर सतत कामाबद्दल बोलणं ही व्यावसायिकता नव्हे.तो व्यावसायिकतेचा अतिरेक आहे.अशा व्यक्ती माणूसपण हरवून केव्हा रोबोटस होतात हे त्यांचे त्यांनाच कळत नाही.अशा व्यक्ती व्यवसाय आणि कुटूंब यापैकी किमान एकावर आणि कधी कधी दोन्हींवर अन्याय करत असतात.व्यावसायिकता आणि कौटुंबिक आयुष्य यात समतोल राखून असलेली मंडळी स्वतःच्या व्यावसायिक क्षेत्रात तर यशस्वी होतातच पण त्यांचं कौटुंबिक आयुष्य देखील समाधानाचं असतं.हे समाधान त्यांना दोन्ही आघाड्यांवर यशाची कमान चढती ठेवायला मदत करतं.सर्व कुटूंबाला त्यांच्या व्यावसायिक यशाचा अभिमान तर असतोच पण व्यवसायातले इतर सहकारीदेखील त्यांच्यापासून प्रेरणा घेत असतात.अमिताभ बच्चन हे असचं एक सर्वपरिचित उदाहरण.अमिताभनं कोणत्याही चित्रपटात पाट्या टाकल्यात असं मला तर माहित नाही.अगदी छोटीसी बात मधला पाहुणा कलाकाराचा रोल असतो किंवा शतरंज के खिलाडी मधला निवेदक.तो त्याच तन्मयतेने आणि तयारीनं आपलं काम चोख करणार हे पक्कं.कौटुंबिक आयुष्यात जया बच्चनचा राज्यसभेतला शपथविधी असो की मुलाच्या लग्नाच्या आधी मंगळाच्या शांतीसाठी वेगवेगळ्या मंदिरात केलेले धार्मिक विधी असतो,अमिताभ त्यातही आपला रोल निभावतांना दिसतो.असा समतोल राखला तरच जीवनाचा खरा आनंद मिळू शकतो.आजच्या तरुणांकडून मला हीच व्यावसायिकता अपेक्षित आहे.

मला अतिथी संपादकाचा बहुमान दिल्याबद्दल स्वप्ना आणि नेटाक्षरीचे मनःपूर्वक आभार.माझ्या आवडत्या नेटाक्षरीस पुढील वाटचालीसाठी आकाशभर शुभेच्छा.



## अतिथी संपादकाची ओळख..

मी डॉ.अशोक कुलकर्णी

शिक्षण - BSC,MBBS,MD,DPH,PHD,FYAPHA

व्यवसाय - शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,औरंगाबाद(नांदेड,पैठण)येथून रोगप्रतिबंधक आणि सामाजिक औषध वैद्यकशास्त्र या विषयाचे प्राध्यापक म्हणून ३४ वर्षे सेवा करुन सेवानिवृत्त.सध्या राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन अंर्तगत,पुणे येथे वरिष्ठ सल्लागार म्हणून कार्यरत.

पुस्तके - वैद्यकीय विद्यार्थ्यांसाठी Text Book of community Medicine,Manual of Biostatistics. या पुस्तकांचे लेखन (डॉ.जयंत बरिदे यांच्यासह)

काव्यसंग्रह - स्पंदन (प्रकाशक-मराठी जनसाहित्य परिषद,अमरावती)

नाट्यलेखन - केलं तुका आन झालं माका आणि रक्त तिचे जाळिते (प्रा.कुमार देशमुख व डॉ.आलोक चौधरी यांसह)

नाटक - व.पु काळेंच्या पार्टनर कादंबरीचे नाट्यरुपांतर राज्यनाट्यस्पर्धेत सादर केले.

छंद - सुमारे ४० मराठी नाटकात आणि सोनेरी डोक्याचा मासा या बालचित्रपटात भूमिका

सन्मान - Indian association of preventive & social medicine उपाध्यक्ष (२००९-१०)

महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापिठात अभ्यासमंडळावर सदस्य

## * काही काही प्रोफेशन्सला बघा काही आळाच नसतो *



सहज जमते त्याला घरासमोर येऊन ऐटीत उभे ठाकणे
कपडे निकालके रखो मेमसाब मै आ रहा हूं असे म्हणणे
असलं हे अचाट साहसी कृत्य फक्त धोबीच करु शकतो
काही काही प्रोफेशन्सला बघा काही आळाच नसतो

दाताड गुल होईल त्याचं जर पाहिलं वळून तिला कोणी
सहज तो हात धरतो तिचा नी हसून पाहती भाऊ दोन्ही
असलं हे अचाट साहसी कृत्य फक्त कासारच करु शकतो
काही काही प्रोफेशन्सला बघा काही आळाच नसतो

एका पोरीसोबत कॉफी घेतली तर हिने बदडून काढलं
तो पन्नास पोरींसोबत असतो,ज्याचं पोस्टर रुममध्ये लावलं
असलं हे अचाट साहसी कृत्य फक्त सिनेनटच करु शकतो
काही काही प्रोफेशन्सला बघा काही आळाच नसतो

व्यथा कोणा कशी सांगू,मला काही कळेनासं झालं
आणि मग हे एक नवकाव्य आपोआपच जन्माला आलं
असलं रिकामटेकडं असलं कृत्य फक्त Analyst च करु शकतो
काही काही प्रोफेशन्सला बघा काही आळाच नसतो

- चंद्रजीत अशोक कांचन,पुणे

* पहाटे पहाटे *



दोस्त..
पहाटे उठून कुणाची वाट पहायची
दिवस गेले आता ते
चक्राच्या आरीवर घड्याळाचे काटे
त्यावर अडकवून स्वतःची मान
गरगर फिरत असतो दोस्त
पहाटे जाग आलीच तर
मेंदूत फक्त चक्रांची घरघर असते
मग आठवतात
गिअर युनिटमध्ये बोटं अडकवून तुटलेले
कामगार
हायड्रोजन सल्फाईडमध्ये गुदमरुन मेलेले
कामगार
ओलियमच्या स्प्रे मध्ये डोळयांच्या खाचा झालेले
येस !
माझे माझे अवयव मला
दिसत असतात वाटेवर
इथे तिथे सांडलेले
पहाटे
पहाटे माझा श्वासच बंद पडतो
माझा श्वासच बंद पडतो

- नाम गुम जायेगा,ठाणे

## * MBBS *



तिला म्हणालो,मला आजकाल झोप येत नाही
काय करु ? तुझी आठवण मला झोपूच देत नाही
क्षणभर विलंब न करता तिने तिची पर्स उघडली
झोपेची गोळी काढून माझ्या हातावरती दिली
काय सांगू तुम्हाला?माझी वेगळीच केस आहे
अहो !प्रेयसी माझी, MBBS आहे
मी म्हणालो,माझ्या प्रत्येक श्वासात तुझाच गंध आहे
रक्ताच्या प्रत्येक थेंबास तुझ्या प्रेमाचा रंग आहे
ती म्हणाली,धीर धर अजून थोडासाच उशीर आहे
उद्या आमच्या रुग्णालयात मोफत रक्तपासणी शिबीर आहे
काय सांगू तुम्हाला?माझी वेगळीच केस आहे
अहो !प्रेयसी माझी, MBBS आहे
मी म्हणालो,तुझ्यासाठी काहीही करु शकतो
माझं ह्दय काढून तुझ्या हाती ठेवू शकतो
त्याक्षणी ती उठली आणि आत निघून गेली
माघारी येतांना हाती डिसेक्शन बॉक्स घेऊन आली
मित्रांनो अशी ही माझी वेगळीच केस आहे
अहो !प्रेयसी माझी, MBBS आहे
एकदा तिच्याशी बोलता बोलता ठेच मला लागली
तिने तिची ओढणी माझ्या पायावरती बांधली
नजरेस नजर मिळवून माझ्या,हळूच ती म्हणाली
पडलास तू पण जखम माझ्या काळजावरती झाली
तर माझी ही केस अशी आहे
एक MBBS माझी प्रेयसी आहे

- ओंकार

## * commerce च्या भाषेत *



जा जायचंय ना तुला मग जा
जातांना तुझा capital घेऊन जा
goodwill मधला तुझा share ही घेऊन जा
partnership firm च sole trading करुन जा
जा जायचंय ना तुला मग जा
सहन केले दोघांनी कधी profit कधी loss
कळलाच नाही कधी कसा आपल्यामध्ये आला cross
सगळ्या books चं इतक्या वर्षांचं audit तरी करुन जा
जा जायचंय ना तुला मग जा
धंदा आहे,खरं खोटं आलंच
पण बरोबर balance काढलाच नाही
एवढासा difference आता मोठा वाटतो
rectification झालाच नाही
suspense का आला ? ते आता पाहू
interest कुठे गेला ? तेही मग शोधू
posting करुन झालंय माझं casting करुन जा
कदाचित शेवटची balance shit,...tally करुन जा
जा जायचंय ना तुला मग जा

- भाग्यश्री फडके,मुंबई

## * बरे झाले *



बरे झाले मी डॉक्टर नाही झालो ते..छोट्या पकडीने दात काढण्याऐवजी मोठी पकड वापरली असती
मग काय हालत झाली असती त्या पेशंटची देव जाणे
बरे झाले मी मेकॅनिकल इंजिनिअर नाही झालो ते
माझ्या धसमुसळेपणामुळे इंजिनाची वाट लागली असती
आणि गडबड्या स्वभावामुळे सगळ्यांचीच धांदल उडाली असती
बरे झाले मी सिव्हिल इंजिनिअर नाही झालो ते
बाकीच्यांच्या विचाराने अजुन आयुष्याची इमारत हलते
छोटासा नको असलेला विचार पण वादळासारखा संपूर्ण वर्तमानाला मुळासकट उखडून टाकतो
मग त्या इमारतीचे आणि त्यात राहणाऱ्या लोकांचे काय झाले असते देव जाणे
बरे झाले मी ड्रायव्हर नाही झालो ते
कारण मध्ये माझा जीवनाचा स्पीड कधी वाढतो तर कधी पूर्णपणे झिरो वर असतो
कसे काय लोक त्यांच्या इप्सितस्थळी पोहचले असते देव जाणे
बरे झाले मी पायलट नाही झालो ते..विमान वर जातांना आणि खाली येतांना भीती वाटते
म्हणून डोळे बंद करोत पायलट झालो असतो तर विमान उडवतांनापण तेच केले असते
बरे झाले मी स्टंटसमन नाही झालो ते..अंगात त्यासाठी जो लवचिकपणा हवा तो नाही म्हणून
प्रत्येक वेळेला ४-५ हाडे मोडून घेतली असती
बरे झाले मी सी.ए.नाही झालो ते
स्वतः परीक्षेत नेहमी गणिते चुकवायचो लोकांचे अकाउंट कसे सांभाळले असते देव जाणे
बरे झाले मी वकील नाही झालो ते..आयुष्यात कधी कुणाशी खोटे बोलू शकलो नाही
कोर्टात खोटे बोलायची वेळ येऊ नये म्हणून देवाने ही व्यवस्था केली
देवाला माझा एका जागेवर बसून काम करायचा गुण चांगलाच माहीत आहे आणि
काम दुसऱ्यांकडून करुन घ्यायचा सुध्दा..म्हणूनच त्याने मला कम्प्युटर इंजिनिअर न बनवता
कम्प्युटर मॅनेजमेंट मध्ये टाकले
देवा तुलाच कळते कोणाला काय द्यायचे ते असेच सगळ्यांना तुला जे पाहिजे तेच बघून देत जा

- आनंद चिंचोरे,ऑस्ट्रेलिया

## * लिपीक मी होणार *



भरभर journal मी लिहणार
मम्मी पपा लिपीक मी होणार

B Pharm केलेला मी एकमेक लिपीक असणार
Photo ऐवजी structure draw करायचं मग कारभार सुरळीत होणार

प्रत्येक मुलाची activity cards मी छापणार
मग Highly active मुलगा college मध्ये पहिला येणार

प्रत्येक मुलाची attendance ASSAY ने मी घेणार
Detect तर present मग proxy नाही लागणार

मस्तीखोर catalyst मी HPCL method ने separate करणार
बिगर catalyst मस्तीची reaction च नाही होणार
म्हटले होते ना मी,कारभार सुरळीत होणार

मम्मी पपा लिपीक मी होणार..लिपीक मी होणार

- राहुल वाळुंज

## * कथा एका Biotechnologist ची *



Biotechnology नाव मोठ्ठं दिसलं , तसं भारदस्तही वाटलं
आपला फिजिक्सशी ३६ चा आकडा , म्हणून biotech घेतलं
हे नक्की काय ?  हे समजण्यात १ वर्षं गेलं
शप्पथ सांगतो तेव्हा मल्याळम ऐकत असल्यासारखं वाटलं
३ वर्षांपासून देतोय micro organisms ची साथ
परीक्षेत तेच लावतात वाट
virus ची नाव सांग ४ विचारतो examiner
मला एकही आठवत नाही बरोबर
microscope च्या lenses बदलता बदलता वर्ष निघून गेलं
slide वर कधी काही नाही दिसलं डोळ्याला भिंग मात्र लागलं
bachelors तर झाली आता masters ही करेन
कोणीतरी देईल तुला नोकरी असं स्वतःला समजावेन
भारतात scope नाही असं बरेच लोक म्हणतात
scope is inside u म्हणणारे महाभागही काही कमी नसतात
सगळे विचारतात , नक्की काय करतोयेस
अरे काय समजावू मी कुठे मरतोय
doctor है क्या तू ? म्हणून एखादा खिजवतो
हाँ जी है लेकिन कीडे मकौडे का म्हणून मी ही वेळ मारुन नेतो
सामान्य माणसाला कळत नाही biotech म्हणजे काय
मला कळत असूनही वळत नाही यापेक्षा मोठं दुःख ते काय ?
असं हे मी भोगतोय ,biotechnologist असूनही
अजून मॅट्रिक पास असल्यासारखाच वाटतोय

- अनघा जोशी, मुंबई

## * मी coding केले नाही (विडंबन)*



मी coding केले नाही, testing ही केले नाही
मी report सुध्दा साधा कधी पाठवलेला नाही..मी coding केले नाही
भवती development चाले,ती विस्फारुन बघतांना
कुणी program चालवतांना कुणी bug fixing करतांना
मी मठ्ठासारखा बसलो, team member सोबत जेव्हा
compile कराया देखील त्याने help केली नाही..मी coding केले नाही
बेजबाबदार मी आहे,मूळ project जिथल्या तिथे
दिवसा orkuting करतो,संध्याकाळी chatting उरकतो
पण डोक्यातून कुठलेही fandoo programming नाही
c++ जमले नाही linux ही कळले नाही..मी coding केले नाही
डोक्यावर लटके जेव्हा deadline ची तलवार
निर्लज्जागत मी घेतो copy-paste चा आधार
मी Manager ला भ्यालो Supervisor ला भ्यालो
मी पगारसुध्दा वाढीव मागितला नाही..मी codingकेले नाही
मी असतो जर अभ्यासू PHD झालो असतो
मी असतो पैसेवाला तर Doctor झालो असतो
मज layoff करुनी कोणी हसले वा रडले नाही
MBA झालो नाही MS ही झालो नाही..मी coding केले नाही

- अनामिक

## * Ophthalmologist आणि ENT Surgeon*



एक Ophthalmologist एका ENT surgeon च्या मनात भरली
कान पाडून आणि घसा खाकरुन त्यानं तिला मागणी घातली
ती म्हणाली,पण हे कसं शक्य आहे ?
डोळे आणि कान यांत चार बोटं अंतर आहे
तो म्हणाला,तुझ्या डोळ्यांसमोरचा चष्मा नाकावरच टिकून आहे
सारांश..चष्म्याला नाकाची,काडीला कानाची
तशी तुला माझी गरज आहे
ती मनात म्हणाली..
याच्या दोन कानामधला प्रदेश
भलताच सुपीक आहे
याला खरंच माझ्या आधाराची गरज आहे
तो समजायचं ते समजला
आणि पुढे झाला
कारण,त्याला माहित होतं
की स्त्री बोलत नाही
तेव्हाच खरं तर ती बोलते
पण ते डोळ्यांनी
आणि ती ?
ती तर Ophthalmologist होती..

- डॉ.अशोक कुलकर्णी,औरंगाबाद

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो त्या व्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन वाचणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही आणि असे करताना आमच्याआयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लाभावा हीच इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**– आमची विनामूल्य ई साप्ताहिके –**

स्वरनेटाक्षरी ऑडिओ अल्बम ,बाल नेटाक्षरी , ई श्टाप

**– प्रसिध्द झालेली ई बुक्स –**

टल्लीची शाळा ,मकरंदच्या त्रिवेण्या , ग्रेव्हयार्ड लिटरेचर , चार क्षण , तो आणि ती ,प्रियेचे अभंग ,देशी दारुचे दुकान , ई शाळा , तो ,मी आणि सिगरेट ,मोरया ,लोकल गोष्टी , मीरा(अनुवाद) ,ओथंब ,सावळ्या मुलीची गाणी ,सईची वही

**आमची ई बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी** - esahity@gmail.com

**नेटाक्षरी हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी** - netaksharee@gmail.com

**आता ई साहित्यची सर्व प्रकाशने सीडी मध्ये देखील उपलब्ध आहेत**

**फक्त ५० रुपयांत १११ ई पुस्तके . संपर्क करा – ९८६९६७४८२०**

**आपल्या स्वरचित कविता नेटाक्षरीत प्रकाशित करण्यासाठी -** meekavee@gmail.com



Professionalism....it's not the job you do , It's HOW you do the job